**श्री.दिलीप भालचंद्र सावंत (निलंबित), उप विभागीय पोलीस अधिकारी यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ईएनक्यू-२०२१/प्र.क्र.२५५/पोल-२**

दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२
तारीख: २४ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :**

१. **शासन आदेश, गृह विभाग, क्रमांकः** एसीबी-२०२०/प्र.क्र.१२१/पोल-२, दि.१७/०६/२०२०
२. **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** निप्रआ-११११/प्र.क्र.८६/११-अ, दि.१४/१०/२०११
३. **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** अभियो-१३१४/प्र.क्र.८६/११-अ, दि.३१/०१/२०१५

**शासन आदेश :**

ज्याअर्थी, श्री.दिलीप भालचंद्र सावंत, उप विभागीय पोलीस अधिकारी, शहापूर, ठाणे ग्रामीण यांना त्यांच्याविरुद्ध शहापूर पोलीस ठाणे, शहापूर येथे गुन्हा नोंद क्र.२२२/२०२०, लाचलुचपत प्रतिबंधक अधिनियम, १९८८ च्या कलम ७, ७ (अ) प्रमाणे दाखल गुन्ह्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन आदेशान्वये निलंबित करण्यात आले होते;

आणि ज्याअर्थी, श्री.दिलीप भालचंद्र सावंत, निलंबित उप विभागीय पोलीस अधिकारी यांच्या निलंबनाचा आढावा सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील शासन निर्णयातील तरतुदींनुसार अपर मुख्य सचिव, गृह यांच्या अध्यक्षतेखालील समितीने दि.१३/१०/२०२१ रोजी झालेल्या बैठकीत घेतला असून, आढाव्याअंती श्री.दिलीप भालचंद्र सावंत, निलंबित उप विभागीय पोलीस अधिकारी यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्याची शिफारस सक्षम प्राधिकारी यांना करण्यात आली होती. त्यास सक्षम प्राधिकारी यांनी मान्यता दिली आहे;

त्याअर्थी, श्री.दिलीप भालचंद्र सावंत, निलंबित उप विभागीय पोलीस अधिकारी यांना त्यांच्याविरुद्ध शहापूर पोलीस ठाणे, शहापूर येथे दाखल गुन्हा नोंद क्र.२२२/२०२० प्रकरणी मा.न्यायालयाच्या अथवा सक्षम प्राधिकारी यांच्या निर्णयाच्या अधीन राहून तसेच त्यांच्याविरुद्धच्या विभागीय चौकशीच्या अधीन राहून या आदेशान्वये श्री.दिलीप भालचंद्र सावंत, उप विभागीय पोलीस अधिकारी यांना या आदेशाच्या दिनांकापासून शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११९२४११२६४०९९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2021.11.24 12:29:22 +05'30'

**(चेतन निकम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्री.दिलीप भालचंद्र सावंत, उप विभागीय पोलीस अधिकारी
(पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या मार्फत)

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर आदेशाची प्रत श्री.दिलीप भालचंद्र सावंत, उप विभागीय पोलीस अधिकारी यांचेवर त्वरीत बजावून दुसऱ्या प्रतीवर त्यांची दिनांकीत पोच स्वाक्षरी घेऊन स्वाक्षरीत मूळ प्रत खास दुतामार्फत शासनास सादर करावी. तसेच श्री.दिलीप भालचंद्र सावंत, उप विभागीय पोलीस अधिकारी यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. निप्रआ-१११२/प्र.क्र.८२/११-अ, दिनांक २०/०४/२०१३ मधील तरतुदींनुसार अकार्यकारी पदावर पदस्थापना देण्याचा प्रस्ताव विहीत कार्यपद्धती अनुसरून शासनास तात्काळ सादर करावा.
२. पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. विशेष पोलीस महानिरीक्षक, कोंकण परिक्षेत्र, नवी मुंबई.

४. पोलीस अधीक्षक, ठाणे ग्रामीण.

५. महालेखापाल - १ व २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

६. अवर सचिव, गृह विभाग, पोल-१ (अ), मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, श्री.दिलीप भालचंद्र सावंत, उप विभागीय पोलीस अधिकारी यांना या शासन आदेशाच्या दिनांकापासून शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले असल्याने, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. निप्रआ-१११२/प्र.क्र.८२/११-अ, दिनांक २०/०४/२०१३ अन्वये श्री.दिलीप सावंत, उप विभागीय पोलीस अधिकारी यांना अकार्यकारी पदावर पदस्थापना देण्याची कार्यवाही त्वरीत करावी.

७. निवड नस्ती, कार्यासन पोल-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.